# एक अभिप्राय

तळेगांवांतील एक प्रसिद्धीपरान्मुख व्यक्तित्व श्री. आप्पासाहेब ठोंबरे. हे थोर तत्त्वचिंतक, क्रान्तिकारी विचारक आणि प्रखर बुद्धिवादी लेखक आहेत. त्यांचें लेखन रोखठोक आणि सडेतोड असतें. त्यांची लेखणी भेदक, खोचक आणि मनाचा सरळ ठाव घेणारी आहे. ते भाषेकडे विशेष लक्ष देत नाहीत. ‘‘भाषा कैसीतरी होका अर्थीं तात्पर्य सज्जना’’ असे ते त्याचें समर्थन करतात. लेखन करतांना अंतरीच्या बेभान वृत्तीमुळें ते साहित्य प्रान्तांत कांहींशी दंडेलीहि करतात. हे किरकोळ दोष सोडले तर त्यांचें लेखन निःसंशय तेजस्वी आहे यांत संशय नाही. स्वतः अनलंकृत राहून त्यांची लेखणी वाचकांच्या हृदयांत आत्मशक्तीची, आत्म-प्रत्ययाची संजीवनी ओतीत आहे. त्यांच्या लेखनांत स्वातंत्र्याच्या असीम उर्मीमुळें एक अननुभूत दीप्तीचा साक्षात्कार होतो. ते वाचकांना उद्देशून म्हणतात, ‘‘तव आंतर अग्नि क्षणभर तरी फुलवावा.’’

आयुष्यांतील कांहीं काळ त्यांनी अनेकविद्याव्यासंग आणि विज्ञानाधिष्ठित कलेच्या संवर्धनांत घालविला. आतां ते धर्म व तत्त्वज्ञान या प्रान्तांत आकंठ बुडून गेले आहेत. या सर्वांचा परिपाक त्यांच्या लेखनांत

दिसून येतो. तत्त्वनिष्ठा आणि विज्ञाननिष्ठा यांचा त्यांच्या मनोबुद्धींत अतूट संबंध निर्माण झाला आहे. विज्ञानावरील त्यांचे विचार आमूलाग्र क्रान्तिकारक आहेत. कारण त्यांना तत्त्वज्ञानाचें मूळचेंच भरभक्कम अधिष्ठान आहे. ते म्हणतात, प्रज्ञा आणि प्रतिभा यांच्यात जोपर्यन्त नवनिर्मितीची क्षमता येत नाही तोपर्यन्त त्यांच्यात पूर्णता आली असे म्हणता येत नाही. माझ्या लेखनांत ही नूतन सृष्टि आहे की नाही हे मी वाचकावर सोपवितो. त्यांचा निर्णय मला शिरोधार्य होईल.

अभ्यास म्हणजे काय हे त्यांच्या लेखांचें चांगले परिशीलन केलें असता समजून येतें. अभ्यासांत संशोधनाला अतिशय महत्वाचें स्थान आहे. यामुळें त्यांच्या लेखनांतून त्यांनी एक नूतन सृष्टि निर्माण केली आहे असे वाटतें. ते म्हणतात, संशोधन वेगळे आणि कल्पनेनें लिहिणें वेगळे. कल्पना कोळ्याच्या जाळ्या-प्रमाणें सवंग असते तर संशोधन मधाच्या पोळ्याप्रमाणें परिश्रमानें परिपूर्ण होतें. संशोधनाला वास्तवाचा भक्कम आधार असतो. तर कल्पना कल्पनासृष्टींतच विहार करते.

विज्ञानाविषयीं त्यांची दृष्टि फारच वेगळी आहे. ते म्हणतात, जीवनाचें मूलभूत स्वरूपच ज्ञान-विज्ञानमय आहें. ज्ञानविरहित विज्ञान ही कल्पनाच मुळीं वेडगळ

आहे. प्रथम ही कल्पना स्वीकारायची आणि नंतर विज्ञानाला ज्ञानाची जोड द्यायची किंवा ज्ञानाला विज्ञानाची जोड द्यायची म्हणजे प्रथम अळणी भाजी खायची आणि नंतर त्यावर मिठाची भुक्की फाकायची तसा हा प्रकार होतो. तत्त्वज्ञानी हाच विज्ञानाचा खरा अधिकारी आहे. त्यालाच हें विज्ञान जीवनांत नेमक अर्थानें उपयोजिता येईल आणि त्याच्याच जीवनांत हें विज्ञान आनंदाचे मळे फुलवील. सर्वसामान्य माणसाचें जीवन विज्ञानानें अतिशय सुकर झाले आहे मात्र त्याच्या मानसिक, बौद्धिक आणि शारीरिक जीवनाची फार मोठी हानी झाली आहे. याचें कारण मानवजातीची अपात्रता हेंच आहे. हा प्रश्न विचार करून सुटणारा नाहीं कारण विचार सर्क्युलर असतो त्यामुळें तो माणसाला कोणीकडून गोत्यांत आणील ते कळणार-देखील नाही. विचार नेहमीच फायद्या-तोटयावर आधारलेला असतो त्यामुळें तो नीतिशास्त्राचा अथवा योग्य काय किंवा अयोग्य काय याचाहि पाया होऊं शकत नाही. सगळेच वक्ते म्हणतात, ज्ञानाला विज्ञानाची अथवा विज्ञानाला ज्ञानाची जोड द्यायला हवी. त्याचें स्वरूप वर लिहिल्याप्रमाणें आहे. ही इतकी सोपी गोष्ट नाही कीं, उचलली जीभ लावली टाळ्याला. गाडीला बैलजोडी लावावी अशा थाटांत अनेक विचारक बोलत असतात.

ते म्हणतात, गीतेवरील पूर्वीची भाष्यें तसेच तत्त्वज्ञाना-वरील पूर्वीचे ग्रंथ पहा आणि त्या पार्श्वभूमीवर ज्ञानेश्वरी आणि अमृतानुभव पहा. या दोन्हींत जमीन-अस्मानाचें अंतर पडलेलें आहे. हा चमत्कार अखिल भारतवर्षांत केवळ महाराष्ट्रांतच घडला. एकदां युवा पंडित जगन्नाथ एका पंडितांच्या सभेंत जरा भावनाशील होऊन बोलला. तर इतर पंडित म्हणूं लागले, अरे, हा पंडितांच्या सभेंत, जेथे शास्त्रचर्चा चालली आहे, तेथे काव्य बोलतो आहे. याला धरा, मारा, ठोका. ज्ञानदेवांच्या बाबतींत असे कांहींच घडलें नाहीं. उलट ज्ञानदेवांचा गुणगौरव करताना भल्याभल्यांचें शब्दभांडारहि अपुरे पडूं लागलें.

आप्पांनी तब्बल पाच वर्षें देऊन १९०७ सालापासून ते १९७० पर्यन्तच्या विशेषतः काव्य आणि साहित्यावरील ग्रंथांचें विविध अंगांनी उत्तम परिशीलन केलें. त्यांचे म्हणणें असे कीं, ज्यांत उत्कृष्ट काव्य आहे, उदाहरणार्थ बालकवि, तेथे अध्यात्म नाही. आणि जेथे अध्यात्म आहे ते पद्यग्रंथ आहेत. गद्याचे ऐवजी पद्य इतकेच. त्याला काव्य म्हणता येत नाही. अनेक समीक्षक गीतरामायणाला काव्य म्हणत नाहीत. अत्युत्तम पद्यग्रंथ असे ते त्याचें वर्णन करतात.

१९७० सालांत त्यांनी लिहिले कीं, आज ललित साहित्यांत अध्यात्म जीवनावर एकहि कादंबरी नाही.

‘मुंगी उडाली आकाशीं’ यांत लालित्य आहे, नाटय आहे. अध्यात्म नांवापुरते आहे. तिला धार्मिक कादंबरी म्हणता येईल. वा.म.जोशी यांची ‘रागिणी’ तसेच पु.य. देशपांडे यांची ‘आहुती’ या दोन्हींना नांव कादंबरीचे, मात्र त्याला स्वरूप प्रबंधाचे आलें आहें. पांगारकरांचा ‘चरित्रचंद्र’ रसाळ आणि गोड आहे— जशी खडिसाखर. पण त्याला ललित साहित्य म्हणता येणार नाही.

या सर्वांच्या तुलनेंत ‘मृण्मयी’,—तिच्यांतील बरेच दोष जमेस धरूनहि—ती एक सर्वोत्कृष्ट कादंबरी आहे असेच म्हणावे लागेल. ते म्हणतात,

दांडेकरांचीच ‘मोगरा फुलला’ ही कादंबरी. मी एकदां त्यांना म्हणालो, तुमच्या या कादंबरीवर मी ५/६ पानें लिहिली आहेत. मात्र तो माझा अभिप्राय प्रतिकूल आहे. ते म्हणाले, त्या लेखनांत तुम्ही मला शिव्या दिल्या असतील तरी त्या चालतील पण मला तें लेखन आणून द्या. मला तें वाचायचंय. कादंबरी—तन्त्र व आशय यानुसार पान १५८ पर्यन्त ती सरस वठली आहे. मात्र तेथून पुढे तिला प्रबंधाचें स्वरूप आलें आहें. ही पुढील कादंबरी वाचतांना मी वैतागलो आणि नकळत त्या लेखनाचा शेवट असा केला—

जाके प्रिय न राम बैदेही {वैदेही
सो त्यजिये कोटी बैरीसम {वैरीसम
यद्यपि परम सनेही {स्नेही

ते म्हणतात, माझ्या लेखणीचा सर्व बंधनें झुगारून असा स्वैरसंचार असतो. एकदां मी त्यांना लिहिले—

माझे हें म्हणणें तुम्हास पटत नसेल तर तुमचीच ही कादंबरी तुम्ही एकदां फिरून वाचा. हा आगावपणाच आहे पण काय करूं? माझा नाइलाज आहे. ते माझ्या-पेक्षां वयाने बरेच मोठे होते म्हणून लिहिले—

अजाण मी लेकरूं, तुजकडे जनकाचें नातें
तव सेवेचा ओढा देवा, असे मात्र मातें

येइल तैसी करितो सेवा, गोड करूनि घ्यावी
कानपिळी हो, परन्तु आपुली, दृष्टि वक्र नसावी

आप्पासाहेबांचें गीतेंवरील लेखन कमालीचें अप्रतीम व सरस झालें आहें. त्यांच्या ५० वर्षांच्या अथक विद्या-व्यासंगाचा तो चमत्कार आहे. ‘मृण्मयी’ ही गो.नी. दांडेकरांची कादंबरी. आप्पांनी या कादंबरीवर समीक्षा लिहितांना इतके परिश्रम घेतलें आहेत कीं, तें पाहून

मन थक्क होते. त्यांच्या या दोन्ही विषयांवरील लेखनांतून एक गोष्ट प्रामुख्यानें जाणवते कीं, गेल्या शतकांतील महाराष्ट्रांतील किती विचार-परंपरा त्यांच्यांत मुरलेल्या आहेत! अनेक संप्रदायांचें त्यांचें आकलन किती मूलगामी आणि मर्मस्पर्शी आहे, हें पाहून अंत:करण भरून येतें. दांडेकरांनी त्यांना पाठविलेल्या पत्रांतून त्यांची एक पुनरूक्ति पहा– ''ठोंबरे, तुमचें लेखन मी घाईगडबडींत वाचूं शकत नाहीं. मूळ लेखकालाहि क्षणभर थांबवून चिंतन करायला लावील अशी त्या लेखनाची जात.'' दुसऱ्या एका पत्रांत ते म्हणतात, ''तुमचें लेखन पोहोचलें. लक्षपूर्वक वाचलें. लिहीत असतां तुमची मनस्विनी लेखणी सर्व बंधनें झुगारून स्वैरसंचार करीत असतें हें तर खरेंच. मात्र वाचीत असतां अनेकदां आश्चर्यचकित होत होतो. जणूं एखादा मशालधारी हातीच्या जळत्या मशालीनें स्वत: कोरलेलें शिल्प, त्या शिल्पीलाच पुन्हा नव्यानें दाखवीत असावा तशी गत होत होती. विषयाच्या तळापर्यन्त सहज पोंचूं शकणारी तुमची प्रज्ञा खरोखरी कौतुकाचा विषय आहे.'' 'मृण्मयी' वरील आप्पांच्या लेखनासंबंधी दांडेकर एका पत्रांत लिहितात, '' मित्रोत्तम ठोंबरे, नमस्कार. तुमचें लेखन मिळालें. ते दिवशीं तुमची खूप वाट पाहिली. तुम्हांस सांगायचें होते कीं, मृण्मयी जणूं तुम्हीच लिहिली आहे इतक्या

पोटतिडकीनें तुम्ही तें सगळेच लेखन केलें आहें. नव्हें, मी तिचा जन्मदाता असे जर मानलें तर धर्मपिता हा मान तुम्ही पटकावला आहे.'' ठोंबरे, कधी जेवायलाच याना! केव्हां येता?— लिहा.''

ते म्हणतात, माझा हा जिव्हाळ्याचा थोर मित्र माझा आणि जगाचा निरोप घेऊन कायमचा निघून गेला—परत कधी न येण्याच्या अटीवर. वेडं मन म्हणतं —

'ओ जानेवाले हो सके तो लौटके आना'

आप्पा ठोंबरे.